**महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगासाठी**

**सहाय्यक अनुदान २०१४-२०१५**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्र.निधिवि-२०१५/प्र.क्र.४३/ऊर्जा-३**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- ३१ मार्च, २०१५

**प्रस्तावना :-**

सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षासाठी महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगासाठी अनुदान म्हणून रु.१,००,०००/- (रुपये एक लाख फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर आहे. सदर अनुदान महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगास वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाचे अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतनाचा खर्च, कार्यालयीन भाडे, आकस्मिक खर्च इत्यादीसाठी लागणारा निधी लक्षात घेऊन, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोगाचा सदर खर्च भागविण्यासाठी रु.१,००,०००/- (रुपये एक लाख फक्त) इतकी रक्कम रोखीने वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. या निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्य अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे, त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्र.के-६ मुख्यलेखाशिर्ष २८०१-वीज, ८०० इतर खर्च, (००) (००) (०५) महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग (२८०१ २४६४) ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या खाली खर्ची टाकावा व तो सन २०१४-२०१५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. सदर रक्कम रु.१,००,०००/- (रुपये एक लाख फक्त) अधिदान व लेखा अधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.वि.म.राजुरकर, अवर सचिव व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.ब.शे.मांडवे, उप सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांना प्राधिकृत करण्यात येत की, त्यांनी महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, यांना अर्थसहाय्य म्हणून मंजूर झालेली रक्कम रु.१,००,०००/- (रुपये एक लाख फक्त) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई यांच्या नांवे स्वतंत्ररित्या धानादेश काढून वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली रक्कम वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या कॅशफ्लोच्या मर्यादेत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१८५/१४/व्यय-१६ दि.३०/०३/२०१५ नुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३१२३२७००७२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vilas M Rajurkar

Digitally signed by Vilas M Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas M Rajurkar
Date: 2015.03.31 23:37:08 +05'30'

(वि.म.राजुरकर)

शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१) सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर, नं.१ १३ वा मजला कफ परेड, कुलाबा, मुंबई-४०० ००५.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
३) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) /लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२ नागपूर
५) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
६) मुख्य अभियंता (विद्युत), महाराष्ट्र शासन, सा.बां.वि.प्रशासकीय इमारत ५९ रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर, मुंबई-४०० ०७१
७) निवासी लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
८) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९) क.अ.(प्रशासन-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३/साधनसंपत्ती/साऊ/व्यय-१६), मंत्रालय, मुंबई-३२.
११) निवड नस्ती (ऊर्जा-३)